राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) योजना सन २०२३ - २४ मध्ये राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११९/३-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २० जून, २०२३

**वाचा -**

१) दि.१७.०५.२०२३ रोजी झालेली राज्य प्रकल्प मंजुरी समितीची (SLSC) बैठकीचे दि. ३०.०५.२०२३ रोजीचे इतिवृत्त
२) केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.३६-२८/२०१७-अेई/विस्तार कक्ष, दि.१५.०६.२०२३
३) संचालक (आत्मा), यांचे पत्र क्र. कृआ./आत्मा/वाकृआ/प्रशा. मं./३५४ /२०२३, दि.१६.०६.२०२३
४) संचालक (आत्मा), यांचे पत्र जा. क्र. आत्मा/प्र.क्र.१५/लेखा/पुराही/३५३/२३, दि.१६.०६.२०२३

**प्रस्तावना -**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत ( NMAET) कृषि विस्तार उप अभियान राबविण्यात येत आहे. सदर उप अभियानात राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) ही योजना केंद्र व राज्य शासनाच्या ६०:४० अर्थसहाय्याच्या प्रमाणात राबविण्यात येते. सदर योजना सन २०२३-२४ मध्ये राबविण्यासाठी एकूण रु. ६०१४.५८ लक्ष रकमेचा राज्य कृषी विस्तार कृति आराखडा (SEWP) तयार करण्यात आला असून मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली दि.१७.०५.२०२३ रोजी राज्य प्रकल्प मंजुरी समितीची (SLSC) बैठक संपन्न झाली. सदर बैठकीत प्रस्तुत प्रकरणी वार्षिक कृती आराखड्यास SLSC ची मान्यता प्राप्त झाली आहे. कृषि आयुक्तालयाने उपरोक्त संदर्भाधीन दि.१६.०६.२०२३ रोजीच्या पत्रान्वये सदर आराखड्यास प्रशासकीय मान्यतेस्तव शासनास सादर केला आहे.

त्यानुसार, या शासन निर्णयान्वये सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी कृषि आयुक्तालयाने सादर केलेल्या कृती आराखड्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णय :**

१. सन २०२३-२४ मध्ये केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) या योजनेच्या अंमलबजावणीस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजना सन २०२३-२४ मध्ये राबविण्यास कृषि आयुक्तालयाने सादर केलेल्या एकूण ६०१४.५८ लक्ष (साठ कोटी चौदा लक्ष अठ्ठावन्न हजार फक्त) रकमेच्या राज्य कृषि विस्तार कृति आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२०१८०४३९५००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.06.20 18:06:26 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति** -

१) मा.मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) मा.राज्यमंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) आयुक्त (कृषि) तथा राज्य नोडल अधिकारी आत्मा, कृषि आयुक्तालय, पुणे
५) संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय, पुणे
६) सर्व जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष आत्मा नियामक मंडळ ( मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून )
७) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
८) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा उपाध्यक्ष आत्मा नियामक मंडळ
१०) संचालक वनामती, नागपूर
११) उप संचालक, आत्मा, सामेती, पुणे
१२) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१३) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१४) सर्व प्रकल्प संचालक (आत्मा),
१५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१६) कृषि विकास अधिकारी, सर्व जिल्हा परिषद
१७) निवड नस्ती (कार्यासन-३अे).